# इस्लाम संदेश

(देशबांधवांसाठी)

लेखक

**अबूजर कमालुद्दीन**

अनुवाद

**प्रा. सय्यद शाह मेहमूद**

“अल्लाहच्या नावाने जो असीम दयावंत व परम कृपावंत आहे”

# माझ्या देशबांधवांनो!

भारत देशासाठी इस्लाम नवीन नाही. मागील बाराशे वर्षापासून ‘अल्लाहु अकबर’ची उद्घोषणा भारताच्या कानाकोपऱ्यात प्रतिध्वनित होत आहे. परंतु काही इतिहासकार, राजनैतिक व्यक्ती आणि मुस्लिम समाजाचे दारिद्र, निरक्षरता आणि आपसांतील दूही, यामुळे सत्य भारतवासियांवर पूर्णपणे स्पष्ट होऊ शकले नाही. इस्लाम धर्मास त्याच्या तात्त्विक आणि नैसर्गिक स्वरूपात देशाबांधवासमक्ष सादर केले जावे. नितांत आवश्यकता आहे की सक्षम प्रसार व निमंत्रणाद्वारे भारताच्या घराघरामध्ये इस्लाम संदेश पोहचविला जावा. सत्याच्या शोधात असलेल्या पवित्र आत्म्यांना त्यामुळे जीवनाचे योग्य ध्येय प्राप्त होईल. संभाव्य नुकसानीपासून ते वाचतील, त्यांना सार्थकता व मोक्षप्राप्तीच्या मार्गावर चालणे शक्य होईल.

इस्लाम काय आहे? कोणत्या तत्त्वांचा पुरस्कार करणारा आहे? भारताला याची काय आवश्यकता आहे? आज याच मुद्द्यांवर मी प्रकाश टाकणार आहे.

## इस्लामची वास्तविकता :–

इस्लामविषयी भारतातील विशाल जनसमुदायात अनेकानेक गैरसमजुती पसरलेल्या आहेत. इस्लामसंबंधी असे समजले जाते की इस्लामचा प्रारंभ पैगंबर मुहम्मद (स.) पासून झालेला आहे आणि हा फक्त मुस्लिमांचाच धर्म आहे. परंतु सत्य अगदी याच्या विरुद्ध आहे. इस्लामची सुरुवात पैगंबर मुहम्मद (स.) पासून नाही तर त्यांच्या माध्यामाने इस्लाम परिपूर्ण झालेला आहे. पैगंबर मुहम्मद (स.) हे प्रेषित शृंखलेचे शेवटचे टोक आहे. त्यांच्यानंतर दुसरे प्रेषित येणार नाहीत. इस्लामचा प्रारंभ तर प्रेषित आदम (अ.) यांच्यापासून झालेला आहे. ते ईशग्रंथ तौरात, इंजिल, जबूर व कुरआननुसार आदीमनुष्य व प्रेषित आहेत. वास्तविक इस्लाम हा अल्लाहचा दीन (धर्म) आहे. त्याची सूचना अल्लाहने ही सृष्टी निर्माण करतानाच केलेली आहे. इस्लाम अंतिम व परिपूर्ण स्वरुपात पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यावर अवतरित करुन संपूर्ण जगाला कसल्याही प्रकारच्या, धर्म, जात, वर्ण, भाषा, भौगोलिक परिसर आणि काल यांची आडकाठी न ठेवता इस्लाम स्वीकारण्याचे आमंत्रण दिले आहे. या दृष्टिकोनानुसार इस्लाम हा नवीन धर्म नाही तर समस्त मानवजातीसाठी अस्खलित ईशधर्म आहे. हा धर्म संपूर्ण मानवजातीचे धरोहर आहे. हा केवळ मुस्लिमांचा धर्म नव्हे तर संपूर्ण सृष्टीचा धर्म आहे. पवित्र कुरआनच्या निम्नलिखित आयाती (सूरह) उपरोक्त विचारांवर भरपूर प्रकाश टाकत आहेत.

१) इस्लाम संपूर्ण सृष्टीचा धर्म आहे. पवित्र कुरआनचा आदेश आहे,

"आता हे लोक अल्लाहच्या आज्ञापालनाची पद्धत (अल्लाहचा दीन) सोडून इतर एखादी पद्धत का इच्छितात? वास्तविकतः आकाश व पृथ्वीमध्ये जे जे काही आहे स्वतःहून किंवा अपरिहार्यपणे अल्लाहला समर्पित झाले आहेत आणि अल्लाहकडेच सर्वांना परतवयाचे आहे. *(दिव्य कुरआन, ३: ८३)*

२) इस्लाम हा समस्त मानवजातीचा धर्म आहे.

"लोकहो! बंदगी (आज्ञाधारकता) करा आपल्या पालनकर्त्याची ज्याने तुम्हाला आणि तुमच्या पूर्वीच्यांनाही निर्माण केले. जेणेकरून तुम्ही (दुष्कृत्यापासून) परावृत्त राहू शकाल. तोच तर आहे ज्याने तुमच्यासाठी पृथ्वीचा बिछाना आणि आकाशाचे छत बनवले आणि आकाशातून पर्जन्य वर्षाविले आणि त्यापासून सर्व प्रकारची पिके व फळे तुमच्या उपजीविकेसाठी उत्पन्न केली. तेव्हा हे जाणत असताना (अन्य कुणालाही) अल्लाहचे समवर्ती ठरवू नका. "

*(दिव्य कुरआन, २:२१-२२)*

दुसऱ्या एके ठिकाणी अल्लाहने आदेश दिला,

"(हे पैगंबर (स.) आणि पैगंबराच्या अनुयायींनो) एकाग्र होऊन आपले लक्ष या धर्माच्या दिशेने स्थिर करा. दृढ बना. त्या प्राकृतिक स्वभावावर ज्यावर सर्वश्रेष्ठ अल्लाहने मानवजातीला निर्माण केले आहे." *(दिव्य कुरआन, ३०: ३०)*

तुम्ही आपली दिशा सरळ अल्लाहकडे केंद्रित करा कारण हा दीन (धर्म) अल्लाहचा स्वभाव विशेष आहे. ज्यानुसार त्याने समस्त मानव जातिस निर्माण केले आहे.

(३) प्रेषित आदम (अ.) यांच्यापासून तर आजतागायत इस्लाम हा समस्त मानवजातीसाठी एकमात्र प्रमाणित धर्म आहे. त्याचे विश्लेषण अनेक ठिकाणी पवित्र कुरआनने अशाप्रकारे केले आहे.

प्रेषित आदमला भूतलावर पाठवताना आदेश दिले,

"तुम्ही येथून खाली उतरा. आमच्याकडून आलेल्या आदेशांचे ज्यांनी पालन केले त्यांच्यासाठी कसल्याही प्रकारच्या भीती व दुःखाची संभावना नाही. आणि जे लोक त्यांची अवज्ञा व इन्कार करतील व आमच्या आयतींना खोटे ठरवतील त्यांच्यासाठी नरक यातना निश्चित आहेत तेथेच त्यांना सदैव रहावे लागेल.

*(दिव्य कुरआन, २:३८-३९)*

इस्लाम म्हणजे एकेश्वरत्व, जे क्रमशः आवश्यकतेनुसार. वेगवेगळ्या काळात

समस्त भूतलावरील मानवजातीसाठी अवतरित करण्यात आला.

''तर काय आता हे लोक अल्लाहच्या उपासनेची अपेक्षित पद्धति सोडून अन्य मार्गाचा अवलंब करु इच्छितात? खचितच धरती व आकाश व त्या मधील सर्व वस्तू येणकेण प्रकारे अल्लाहच्याच अधीन आहेत व प्रत्येकाला अल्लाहकडेच परतावयाचे आहे. (हे प्रेषित) सांगा की आम्ही फक्त अल्लाहवरच श्रध्दा ठेवतो आणि त्याच शिकवणूकीवर श्रध्दा ठेवतो जी आम्हांवर अवतरित आहे.

''त्या शिकवणीदेखील मान्य करता इब्राहीम(अ.), इस्माईल(अ.), इसहाक(अ.), व याकूब(अ.)च्या संततीवर अवतरित झाली होती आणि त्या आदेशांवरदेखील श्रध्दा ठेवतो. जी मूसा (अ.) व इसा (अ.) आणि दुसऱ्या अन्य जी अल्लाहकडून दिली गेली आहे. आम्ही त्यांच्यामध्ये कसलाही भेदभाव करीत नाही. आणि आम्ही अल्लाहचे मुस्लिम (आज्ञाकारी) आहोत. ह्या इस्लाम व्यतिरिक्त जो कोणी अन्य जीवनपध्दत स्वीकारू ईच्छितो त्याची ती पद्धति कदापि स्वीकार केली जाणार नाही आणि पारलौकिक जीवनात तो अयशस्वी व निष्फळ राहील.''

*(दिव्य कुरआन, ३:८४ ते ८५)*

एक अन्य ठिकाणी अल्लाहचा आदेश आहे,

''अल्लाहने तुमच्यासाठी धर्माची तीच पद्धत निश्चित केली आहे जिची आज्ञा त्याने नूह(अ.) ला दिली होती आणि जिला (हे मुहम्मद (स.) आता तुमच्याकडे आम्ही दिव्य बोधाद्‌वारे पाठविले आहे. आणि जिचा आदेश आम्ही इब्राहीम (अ.) आणि मूसा (अ.) व इसा (अ.) यांना दिलेला आहे, या ताकिदीसह की प्रस्थापित करा या धर्माला आणि यात फाटाफूट होऊ देऊन नका. हीच गोष्ट या अनेकेश्वरवाद्यांना अत्यंत अप्रिय झाली आहे, जिचे (हे मुहम्मद(स) तुम्ही यांना आंमत्रण देत आहात. अल्लाह ज्याला इच्छितो आपला बनवितो आणि तो आपल्याकडे येण्याचा मार्ग त्यालाच दाखवितो जो त्याच्याकडे रूजू होत असतो.'' *(दिव्य कुरआन, ४२:१३)*

अल्लाहचे प्रेषित प्रत्येक राष्ट्र, प्रत्येक जातीत, प्रत्येक भूभाग, प्रत्येक भाषा आणि प्रत्येक काळात येऊन गेले आहेत. पवित्र कुरआन फर्मावतो, ''लिकुल्ली कौमिन हादिन'' म्हणजे आम्ही प्रत्येक जातीत मार्गदर्शक पाठविला आहे. उदाहरणार्थ, काही प्रेषितांच्या नावांचा उल्लेख केला आहे आणि शेष प्रेषितांबद्दल फर्मान आहे,

''(हे प्रेषित (स.)) तुमच्यापूर्वी आम्ही अनेक रसूल (प्रेषित) पाठविले आहेत. ज्यांच्यापैकी काहींची माहिती आम्ही तुम्हाला सांगितली आहे व काहींची सांगितलेली नाही.'' *(दिव्य कुरआन, ४०: ७८)*

दुसऱ्या एके ठिकाणी सांगितले आहे,

"आम्ही प्रत्येक जनसमुदायात प्रेषित पाठविले व त्यांच्याव्दारे खबरदार केले आहे, की फक्त अल्लाहचीच भक्ती करा आणि अनिर्बंध बनलेल्या (तागूत) च्या उपासनेपासून अलिप्त राहा." *(दिव्य कुरआन, १६:३६)*

**पैगंबर मुहम्मद (स.) यांचे विशेष महत्त्व :-**

संपूर्ण प्रेषितांच्या शृंखलेत पैगंबर मुहम्मद (स.) यांना (एक विशेष स्थान व महत्त्व प्राप्त आहे कारण, पैगंबर मुहम्मद (स.) प्रेषितांच्या शृंखलेतील शेवटची कडी आहे.

"(लोकहो!) मुहम्मद (स.) तुमच्या पुरूषांपैकी कुणाचेही पिता नाहीत. परंतु ते अल्लाहचे संदेशवाहक व अंतिम प्रेषित आहेत. अल्लाह प्रत्येक वस्तूचे ज्ञान राखणारा आहे." *(दिव्य कुरआन, ३३: ४०)*

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे दुसरे महत्त्वपूर्ण स्थान म्हणजे त्यांचे पैगंबरत्व समस्त मानवजातीसाठी आहे.

"(हे मुहम्मद) सांगा, लोकहो!, मी तुम्हांसर्वांकडे त्या अल्लाहकडून पाठविलेला पैगंबर आहे, की जो पृथ्वी व आकाशांच्या राज्यांचा स्वामी आहे. त्याच्याशिवाय दूसरा कोणीच पूजनीय नाही, तोच जीवन देतो, तोच मृत्यू देतो. तरी श्रध्दा ठेवा त्याच अल्लाहवर आणि त्याने पाठविलेल्या या निरक्षर प्रेषितावर जो अल्लाहच्या आदेशाचे पालन करणारा आहे. त्याच्या मार्ग अवलंबन करा. त्याचेच अनुसरण करा जेणेकरून तुम्हास सन्मार्ग प्राप्त होईल." *(दिव्य कुरआन, ७:१५८)*

एका अन्य ठिकाणी फर्मान आहे,

"आणि हे प्रेषित, आम्ही तुम्हांस समस्त मानवजातीसाठी मार्गदर्शक आणि उद्धारकर्ता बनवून पाठविले पण पुष्कळ लोक जाणत नाहीत."

*(दिव्य कुरआन, ३४:२८)*

पैगंबर मुहम्मद (स.) याचे तिसरे महत्त्वपूर्ण स्थान म्हणजे अतिदयावान पैगंबरत्व होय.

"वमा अर्सलनाका इल्ला रहमतुल लिल आलमीन" अर्थात "आम्ही आपणांस समस्त विश्वासाठी करुणा बनवून पाठवले आहे."

पैगंबर (स.) यांचे चौथे महत्त्व म्हणजे त्यांच्यावर इस्लाम (अल्लाहची धर्मव्यवस्था) पूर्णत्वास पोहोचला. समस्त मानवजातीसाठी इस्लाम एकमेव धर्म म्हणून प्रमाणित केला गेला.

"आज मी (अल्लाहने) तुमच्यासाठी दीन (जीवनधर्म) परिपूर्ण केलं आणि माझी संपूर्ण कृपादृष्टी तुमच्यावर केली आणि तुमच्यासाठी इस्लामला तुमचा धर्म म्हणून स्वीकृति प्रदान केली." *(दिव्य कुरआन, ५:३)*

"अल्लाहजवळ धर्म फक्त इस्लाम आहे. या धर्मापासून दूर जाऊन जे विभिन्न मार्ग त्या लोकांनी अवलांबिले, ज्यांना ग्रंथ दिले गेले होते, त्यांच्या दुराचरणाचे कारण याशिवाय अन्य काही नव्हते की त्यांच्यापर्यंत ज्ञान पोहचल्यानंतर आपसांत एकमेकांशी अतिरेक करण्यासाठी वापर केला. आणि जो कोणी अल्लाहचे आदेश व त्यांच्या सूचनांचे पालन करण्यास नकार देईल त्यांचा हिशेब घेण्यास अल्लाहला विलंब लागत नाही." *(दिव्य कुरआन, ३:१९)*

खाली नमूद केलेल्या आयती (ऋचा) व त्यांच्या स्पष्टीकरणावरुन सिद्ध होते की या सांसारिक जीवनाचे यश व समृद्धी फक्त आणि फक्त याच धर्मा (इस्लाम) शी निगडीत आहे. जो त्याचा स्वीकार करील, यशस्वी होईल आणि जो अमान्य करील ती व्यक्ती असो वा समाज, निश्चितच तोट्यात राहील.

कुरआन स्पष्टोक्ती आहे,

"शपथ आहे काळाची. मानव तोट्यात आहे. त्या लोकाशिवाय ज्यानी श्रध्दा बाळगली. सत्य कर्म केले आणि सत्यकर्म करण्याचे आदेश दिले आणि जीवनात संयम व विवेक आचरले." *(दिव्य कुरआन, १०३: १-३)*

## इस्लाम कोणत्या बाबींचे नेतृत्व करतो?

आपण आता एक कटाक्ष टाकू या, त्या बाबींवर ज्यांचे पथप्रदर्शन इस्लाम करीत आहे. तद्नंतर विचार करु या की देशाला इस्लामची आवश्यकता का आहे? त्याचबरोबर देशासाठी इस्लामचा संदेश काय आहे.

## एकेश्वरत्व :-

इस्लामने ज्या तत्त्वावर सर्वांत अधिक महत्त्व दिले आहे ते तत्त्व आहे एकेश्वरत्वाची संकल्पना. म्हणजेच या सृष्टीचा निर्माता, विधाता; स्वामी व सम्राट फक्त एक अल्लाह आहे. त्याच्या गुणविशेषात व अधिकारात कोणीही कशाही प्रकारची भागीदारी करु शकत नाही. मानव अल्लाहव्यतिरिक्त कोणाही मनुष्य; देवदूत; देवी-देवता; वृक्ष-पर्वत; सूर्य-चंद्र; समुद्र इ.ची उपासना करू शकत नाही. म्हणूनच इस्लामी शिकवणुकीनुसार उपासना व आज्ञापालन फक्त आणि फक्त अल्लाहचेच आहे. अल्लाहच्या अधिकारक्षेत्रात केवळ आध्यात्मिक विकासच नसून संपूर्ण सामाजिक, सांस्कृतिक, राजकीय पर्स्थिती आहे. या सर्वांचे आचरण व व्यवस्थापन अल्लाहच्या

आदेशानुसारच झाले पाहिजे. या शिकवणीचा खुलासा असा आहे की अल्लाह या सृष्टीचा एकमेव स्वामी व सम्राट आहे. म्हणूनच मानवजीवनाला न्याय व स्थिरता देण्यासाठी आणि प्रगतीसाठी नितांत आवश्यकता आहे, की ज्याप्रमाणे अल्लाहच्या इच्छा अपेक्षा आकाशात सार्थक होतात त्याचप्रमाणे या भूतलावरसुद्धा पूर्ण झाल्या पाहिजेत.

## मानवी एकमेवाद्वितीयता :-

इस्लामने अल्लाहच्या एकेश्वरी तत्त्वानंतर ज्या तत्त्वावर अधिक भर दिला आहे ते तत्त्व आहे मानवाची एकमेवाद्वितीयता. आधुनिक काळातील ज्ञान आपल्या प्रगतीच्या उच्च शिखरावर पोहचूनसुद्धा या तत्त्वाच्या वास्तविकतेला पूर्णपणे जाणू शकले नाही. म्हणूनच मानवसमाज व्यक्तीकेंद्रित मनुष्यनिर्मित वंश व कुळात विखुरला गेला आहे. आधुनिक काळात व्यक्ती / मानवाच्या महत्त्वाची संकल्पना जरी स्वीकारण्यात आली तरी दृष्टिकोन काही प्रमाणात बदललेला आहे. तरीदेखील मानवाला मानवाच्या स्तरावर ठेवून त्याला समानतेचा अधिकार देण्यात आलेला नाही. आज जास्तीतजास्त जातीय व धार्मिक संघांची स्थापना झाली. पण हे इस्लाममधील मानवी महत्त्वाच्या विपरीत आहे. जोपर्यंत मानव किवा मानवी समुदायास महत्त्व हा दृष्टिकोन समाजात पूर्णतः स्वीकृत होत नाही तोपर्यंत या भूतलावर स्थायी शांतीची कल्पना एक सुंदर स्वप्न मात्रच राहणार आहे.

इस्लाम शिकवणुकीनुसार समस्त मानवजात एकाच माता-पित्याची संतान आहे. आज तो हिंदू असो किंवा शीख, ख्रिश्चन असो किंवा मुस्लिम, चीनी असो किंवा जापानी, अमेरिकन असो किंवा रूसी, ब्राह्मण असो किंवा क्षुद्र, काळा असो किंवा गोरा, इंग्रजी भाषिक किंवा अरबी बोलणारा. श्रीमंत असो किंवा गरीब. कोणत्याही धर्म किंवा पंथाचा मानणारा असो, जगातील कोणत्याही भूभागाचा निवासी असो, स्त्री असो वा पुरुष सर्व आपसांत बंधु - भगिनी आहेत.

जात व कुळांची विभागणी केवळ ओळख व परिचयासाठीच आहे. जात, बिरादरी, कूळ व घराणे यांना इस्लाममध्ये कसल्याही प्रकारचे महत्त्वाचे स्थान नाही. त्याच्या आधारावर विशेष अधिकार किंवा सन्मानाची अपेक्षा बाळगणे हे अज्ञान व भ्रामकतेचे लक्षण आहे. इस्लाम याच गैरप्रकारांना दूर करु इच्छितो. इस्लामच्या दृष्टीने समस्त मानवजात एक व समान आहे. सर्व समान अधिकाराचे व हक्कांचे स्वामी आहेत. कोणीही मानव संपत्ती किंवा कुळाच्या अभिमानाने दुसऱ्याला हीन किंवा दबावाखाली ठेवू शकत नाही. जन्माने कोणीही अपमानित किंवा सन्मानित होऊ शकत नाही. संपूर्ण मानवसमाज जन्मतः सन्मानित, समानाधिकारी व आदरास पात्र आहे. एका व्यक्तीचे दुसऱ्या व्यक्तीस तुच्छ लेखणे अल्लाहच्या दृष्टीने महापाप आहे.

असले विचार त्या व्यक्तीस अल्लाहच्या नजरेमध्ये तुच्छ ठरवतात. इस्लामने महानता व सन्मानाचा एकमेव दृष्टिकोन स्वीकारलेला आहे तो असा आहे की, ज्याच्या मनामध्ये ईशभय अधिक आहे, ज्याच्या हृदयी अल्लाहची जितकी जास्त भीती आहे तो निश्चितच अल्लाहच्या आदेशांचे जास्तीतजास्त पालन करणारा असेल. तो मानवामानवांत कदापि भेदभाव करणार नाही. सर्वांचे अधिकार तो न्यायानुसार पूर्ण करील आणि मानवधर्माची सेवा करणे तो आपले आद्य कर्तव्य मानेल. स्पष्टच आहे अशा दृष्टिकोनाची व्यक्ती अल्लाह व समाज दोघांच्या नजरेत सन्मानित आहे. अशाप्रकारे इस्लाम मानवी महत्ता आणि बंधुत्वाचा ध्वजधारक आहे. व्यक्तिगत व सामाजिक ध्येयांचा रक्षक आहे. जो वास्तविक स्वातंत्र्य व लोकशाहीचा आत्मा आहे.

## इस्लामचा अद्वितीयत्व :-

इस्लामचे तिसरे गुणविशेष आहे एक जीवप्रणालीचे तत्त्व, इस्लामच्या दृष्टिकोनानुसार अनेक धर्म होऊच शकत नाहीत. धर्म सृष्टीच्या आरंभापासून एक राहिलेला आहे. अल्लाह एक आहे, समस्त मानवजात एक आहे, तर मानवाच्या मार्गदर्शनासाठी व शिकवणीसाठी जीवनादेशसुद्धा एकच आहे. बहुधर्मवादाची कल्पना खालील अपभ्रष्टतेला दुजोरा देणारी ठरते.

१) धर्म हा ईशनिर्मित नसून मनुष्य मस्तकाची उपज आहे.

२) मानव मानव एक नसून त्यांच्यामध्ये अंतर आहे.

या दोन्ही उपरोक्त कल्पना किंवा विचार अयशस्वी व अनुचित आहेत. मानवता एक घटक (णळिीं) आहे. त्याच्या गरजा व पूर्तीमध्ये समानता दृष्टीस पडते. या विधानाला जवळजवळ संपूर्ण जगात स्वीकारले गेले आहे. प्रश्न उरला तो - धर्म ईशनिर्मित असतो - हे मानण्याचा आणि जोपर्यंत ईश्वर सद्‌बुध्दी देत नाही तोपर्यंत हे घडत नाही. धर्म जर ईशनिर्मित नसेल तर मग त्याचे स्वरूप व संबंध हे सत्य व वास्तविक मुळीच राहणार नाही. त्याच अर्थाने सर्वधर्मसमभाव हा कल्पनाविलास ठरतो, तर धर्म एकच आहे हा विश्वासच रास्त ठरतो. म्हणून सर्व धर्मांचा आदर ही एक व्यर्थ गोष्ट ठरते. जेव्हा एका दुसऱ्या धर्माची शक्यताच नाही तर मग आदर-अनादराचा प्रश्नच उद्‌भवत नाही. येथे एक प्रश्न उद्‌भवतो की अस्तित्वात नसलेल्या धर्माला काही लोक धर्म म्हणून का मान्यता देतात? काय म्हणून त्याचे पालन करतात? पवित्र कुरआनने या प्रश्नांचे उत्तम प्रकारे समाधानकारक उत्तर दिले आहे.

‘‘प्रारंभी लोकांचा एकच समुह समाज होता. तेव्हा अल्लाहने प्रेषित पाठविले शुभवार्ता देणारे आणि सावधान करणारे आणि त्यांच्या सोबत ग्रंथ अवतरले त्यांच्यामध्ये निर्णय करण्यासाठी, ज्यामध्ये ते मतभेद करीत होते. मतभेद त्यांनीच

निर्माण केला ज्यांना सत्याचे ज्ञान दिले होते. त्यांनी स्पष्ट मार्गदर्शन प्राप्त झाल्यानंतर ही आपापसातील दुराग्रहामुळे त्यामध्ये मतभेद केले. ज्यांनी ईमान धारण केले त्यांना अल्लाहने आपल्या हुकुमाने तो सत्यमार्ग दाखवला ज्यामध्ये लोकांनी मतभेद केले होते. अल्लाह ज्याला इच्छितो त्याला मार्ग दाखवितो.'' *(दिव्य कुरआन, २:२१३)*

प्रारंभी समस्त मानवजात एकाच धर्माचे पालनकर्ते होते. तद्‌नंतर ही परिस्थिती कायम राहीली नाही. व (त्यात मतभेद निर्माण होऊ लागले) तद्‌पश्चात अल्लाहने आपले प्रेषित या भूतलावर पाठविले. ते सर्व सद्‌मार्ग दाखविणारे व वाममार्गाचे दुष्परिणाम दाखविणारे होते व त्यांच्यासोबत ईशग्रंथ अवतरित केले. जेणेकरुन सत्यासंबंधी त्यांच्यामध्ये जे मतभेद होते ते दूर व्हावे. दुर्दैवाने हे मतभेद त्याच लोकांनी निर्माण केले ज्यांना अल्लाहने सत्य ज्ञान दिले होते. त्यांनी पवित्र ज्ञानप्राप्तीनंतर त्याचा त्याग करुनच अन्य मार्गाचे अवलंबन केवळ दुसऱ्यांवर वर्चस्व करण्यासाठी केले. त्या लोकांनी प्रेषितांवर ईमान ठेवले, अल्लाहने त्यांनाच सत्यमार्ग दाखविला. अल्लाह ज्यावर प्रेम करतो त्यालाच सत्यमार्ग दाखवितो.

या एक तत्त्वाला स्पष्ट करण्यासाठी पवित्र कुरआनमध्ये अनेक ठिकाणी विषद केले आहे, 'आम्ही प्रेषितांमध्ये कोणत्याही प्रकारचे अंतर अथवा भेदभाव करीत नाही.' हेच कारण आहे की एका व्यक्तीस मुस्लिम होण्यासाठी ज्याप्रमाणे प्रेषित मुहम्मद (स.) वर ईमान ठेवणे आवश्यक आहे. त्यांचा आदर करणे अनिवार्य आहे. त्याचप्रमाणे इतर प्रेषित जसे इसा (अ.) मूसा (अ.) इब्राहीम (अ.) व नूह (अ.) इत्यादी प्रेषितांवरसुद्धा ईमान ठेवणे आवश्यक आहे. जर कोणी व्यक्ती त्या सर्व प्रेषितांवर अथवा त्यांच्यापैकी कोणा एकावर ईमान ठेवित नसेल तर तो मुस्लिम (आज्ञाधारक) असूच शकत नाही. एक भ्रामक कल्पना रूजलेली आहे की इसा (अ.) ख्रिश्चन धर्माचे व मूसा (अ.) यहुदी धर्माचे संस्थापक आहेत. वस्तुस्थिती किंवा सत्य तर हे आहे की यांच्यापैकी कोणीही कोणत्याही धर्माचा संस्थापक नाही. तर सर्व प्रेषितांनी एक दीन (धर्म), अल्लाहची बंदगी (उपासना) चे निमंत्रण दिले आहे. त्यासच म्हटले गेले आहे इस्लाम, यहुदी आणि इसाई धर्मतत्व इस्लाम धर्माच्या तत्त्वांशी इतके एकरुप आहेत की स्वीकारावेच लागते की हे एकाच धर्मवृक्षाच्या फांद्या आहेत, नंतरच्या काळातील लोकांनी त्यांना मूळ वृक्षाच्या बुंध्यापासून तोडून विभक्त करून टाकले आहे. कुरआन हेच स्पष्ट करण्यासाठी निवेदन करतो.

''यहूदी म्हणतात, यहूदी झालात तरच सद्‌मार्ग प्राप्त कराल. इसाई म्हणतात ख्रिश्चन झालात तरच सन्मार्ग पावाल. त्यांना सांगा या सर्वांचा त्याग करून इब्राहीमचा (अ.) मार्ग स्वीकारा. इब्राहीम अनेकेश्वरवादी नव्हता. श्रद्धावंतांना तुम्ही सांगा की

आम्ही ईमान आणलं अल्लाहवर व त्या शिकवणूकीवर जी आमच्यावर अवतरीत झाली आहे व जी इब्राहीम, इस्माईल, इसहाक, याकूब व याकूबच्या संतानावर अवतरीत झाली होती व जी मूसा व इसा आणि दुसऱ्या समस्त प्रेषितांवर त्याच्या रब (स्वामी) कडून पाठविली गेली होती. आम्ही त्यामध्ये कसलाच भेदभाव करीत नाहीत व आम्ही अल्लाहचे मुस्लिम (समर्पण करणारे) आहोत.'' *(दिव्य कुरआन, २: १३५-१३६)*

एका दुसऱ्या ठिकाणी पवित्र कुरआन अधिक स्पष्टीकरण देत विषद करतो.

''अल्लाहने तुमच्यासाठी धर्माची तीच पद्धत निश्चित केली आहे जिची आज्ञा त्याने नूह(अ.) ला दिली होती आणि जिला (हे मुहम्मद (स.) आता तुमच्याकडे आम्ही दिव्य बोधाद्‌वारे पाठविले आहे. आणि जिचा आदेश आम्ही इब्राहीम (अ.) आणि मूसा (अ.) व इसा (अ.) यांना दिलेला आहे, या ताकिदीसह की प्रस्थापित करा या धर्माला आणि यात फाटाफूट होऊ देऊन नका. '' *(दिव्य कुरआन, ४२: १३)*

उपरोक्त बाबींचे अधिक स्पष्टीकरण कुरआन अशाप्रकारेसुद्धा करतो की कुरआन प्रस्तुत करणारा प्रेषित कोणी वेगळा प्रेषित नाही व कुरआनची शिकवण वेगळी नसून पूर्वीच्या आदेशांचीच सत्यता प्रमाणित करीत आहे जी इंजिल व तौरातमध्ये नमूद केलेली आहे. शिवाय अन्य ईशग्रंथात नमूद आहे.

त्याने (अल्लाहने) तुम्हावर हे ग्रंथ अवतरित केले, जे सत्य आहेत आणि त्या सर्व ग्रंथांचे सत्य प्रमाणित करतो जे पूर्वी अवतरित झाले आहेत. या अगोदर मानवाच्या मार्गदर्शनाच्या हेतूने तौरात व इंजिल अवतरित केले होते.

अशा प्रकारे कुरआन कोणत्याच प्रेषितांचे किंवा त्यांना प्रदान केलेल्या ग्रंथांचे खंडन करीत नाही. तो 'फुरकान' अर्थात सत्य-असत्यामधील भेद दर्शविणारा आहे. कुरआनचा पाया कोणत्याही धर्माच्या खंडन करण्यावर नसून धर्माच्या व्यवस्थापनावर आहे व त्याला एकेश्वरत्वाच्या मालिकेत गुंफून, अन्य मार्गाचा त्याग करुन एका सत्य मार्गाची रचना करणे आहे.

भारतात लोक वेदांना ईशग्रंथ मानतात. वेदांमध्ये ईश्वर एक आहे व धर्म एकच आहे, असा उल्लेख अनेक ठिकाणी आपणांस सापडतो. काही प्रारंभिक व अंतिम सत्यांचा उल्लेखसुद्धा सापडतो. हे सर्व या वस्तुस्थितीची ग्वाही देतात की सर्व मार्गांचा त्याग करुन व सर्व बाबींपासून परावृत्त होऊन अल्लाहच्या प्रेषितांनी दर्शविलेल्या मार्गानुसार, जीवनाच्या सर्व क्षेत्रांत एक अल्लाह अथवा ईश्वराची उपासना केली पाहिजे. असे जर घडले तर बहुधर्मत्वाचा वादच समाप्त होईल व संपूर्ण मानवसमाज एकाच मार्गाचा अवलंब करणारा होईल.

येथे एक गोष्ट नमूद करावीशी वाटते की मागील सर्व प्रेषितांची शिकवण जी या ग्रंथांत अस्तित्वात आहे आणि ऐतिहासिक पद्धतीने जी आज आमच्या समक्ष अस्तित्वात आहे त्यापैकी पुष्कळशी माहिती गायब आहे किंवा नंतरच्या लोकांनी आपल्या खोडसळपणा किंवा अज्ञानामुळे बदलून टाकली आहे. म्हणून जीवनयापनासाठी तो प्रमाणित मार्ग नाही. आता इस्लामच जो पैगंबर मुहम्मद (स.) वर अवतरित झालेला आहे, जीवनयापनाचा एकमेव, प्रमाणित व परिपूर्ण ईशमार्ग व व्यवस्थापन आहे. आता जर कोणी व्यक्ती आपल्या गतधर्माचे परिपूर्ण पालन करू इच्छित असेल, सर्व धार्मिक व्यक्तीचे केवळ तात्त्विकच नव्हे तर कृतीने आदरसन्मान करू इच्छित असेल तर त्याला इस्लाम स्वीकारावा लागेल.

भारताच्या विशेष पार्श्वभूमीमध्ये इस्लाम स्वीकार करणे म्हणजे धर्मांतर नसून सत्यधर्म स्वीकारणेच आहे. हे धर्मांतर (उकअछत्रइए जऋ ऋअखढक) नसून सत्यधर्म स्वीकृती (अललर्शीरिलिश षि षरळींह) आहे. कारण हिंदू धर्माच्या महान तत्त्वानुसार हिंदू धर्म, धर्म नसून एक संस्कृती (उींश्रीीश) आहे आणि संस्कृती धर्माचा केवळ एक भाग मात्र असते व त्याचे प्रदर्शन विशेषतः सामाजिक तत्त्वानुसार अमलात आणले जाते व त्यामुळे जीवनाच्या कोणत्याही विश्वासाची (षरळींह) पूर्ती होत नाही. हेच कारण आहे की सध्या हिंदू धर्माला भारतीय नागरिकतेशी सलग्न केले जात आहे आणि भारत मातेला ईशसिंहासनावर आरूढ करण्याचे यत्न केले जात आहे. वास्तविकतः धर्म आणि नागरिकता दोन वेगवेगळ्या बाबी आहेत. विश्वास (षरळींह) बदलल्याने नागरिकता बदलत नाही. एक व्यक्ती हिंदू असताना जर भारतीय नागरिक होता तर इस्लाम धर्म स्वीकारल्यानंतरसुद्धा तो भारतीयच राहील. जर ती भारताला आपला देश मान्य करीत असेल किंवा भारतामध्ये जन्मलेला होती. काही गटांद्वारे असा विपर्याय केला जात आहे की धर्मपरिवर्तनामुळे नागरिकता परिवर्तन होते. विश्वास एक बाब आहे. तर राष्ट्र वेगळी बाब आहे. धर्मांतरामुळे देशांतर होत नाही. दोन्ही ही गोष्टी आपआपल्या ठिकाणी पूर्ण व अटळ आहेत.

## निर्णयाच्या दिवसाची संकल्पना :-

इस्लाममध्ये चौथी संकल्पना आहे ती निर्णयाच्या दिवसाची. ख्रिश्चन धर्म विश्वासानुसार मोक्ष (ओींशिाशीं ढरीीलीळींळिीं) आणि वेदांतिक तत्त्वज्ञानानुसार (ढरीीलीळींळिीं षि ीींश्र) च्या आवागोन (अवागमन) पेक्षा कित्येक पटीने शास्त्रशुद्ध, बुद्धीस पटणारी व सत्याधिष्ट आहे. ख्रिश्चन विश्वासानुसार प्रेषित इसा (अल्लाह क्षमा करो) अल्लाहचे पुत्र होते. आणि समस्त मानवजातीला (जगाच्या प्रारंभापासून) मुक्तीप्राप्तीसाठी आपल्या जीवनाची आहुती देऊन त्या सर्वांना स्वर्ग

आणि मोक्षाची हमी दिली जे ख्रिश्चन धर्म स्वीकारतील. मग त्याचे आचार कसेही असोत. दुसऱ्या बाजूस अवागमन संकल्पनेनुसार मान्य केले जाते की मानवाच्या जीवनाचे अंतिम लक्ष्य मोक्षप्राप्ती आहे. याचाच अर्थ आहे वारंवार होणाऱ्या पुनर्जन्मापासून बचाव होणे आहे व अंतत: ईश्वराच्या आत्म्यात विलिन होणे आहे. या विश्वासानुसार मनुष्य आपले कर्माचे फळ भोगण्यासाठी वारंवार जन्म घेतो. सत्कर्म केले असतील तर चांगल्या कुळात जन्म घेतो व पूर्वजन्मी कुकर्म केले असतील, तर हीन किंवा तुच्छ कुळात जन्म घेतो. स्वीकार करतो की क्षूद्र कुळातील जन्म आपल्या पूर्वजन्मी केलेल्या कुकर्माचा परिणाम आहे. अथवा मनुष्यावर जी संकट येतात किंवा असाध्य रोग जडतात ही त्याच्या पूर्वजन्माच्या कुकर्माची शिक्षा आहे. तसेच मनुष्य आपल्या पूर्वजन्माच्या कर्मानुसार वृक्ष, झुडपे, किडे, मुंगी किंवा कुत्रा, मांजर यांच्या योनीत जन्म घेऊ शकतो. अशा प्रकारचा विश्वास कमजोर, तोकडा आहे की त्यावर व्यवहारी भाष्य करण्याची गरजच उरत नाही. आश्चर्य वाटते ते याबद्दल की पुष्कळसे समंजस व ज्ञानी लोकसुद्धा अशाप्रकारचे विश्वास बाळगतात. कदाचित आपल्या पूर्वजांच्या विश्वासाबद्दल आदर दाखविण्यासाठी किंवा ते आपल्या पूर्वजांना अपमानित करु इच्छित नसतील किंवा निर्णयाच्या दिवसावर विश्वासच न ठेवून ते आपण स्वत: या जन्माच्या सत्कर्माच्या व उत्तरदायित्वाच्या जबाबदारीपासून मुक्त होऊ इच्छित असतील. निर्णयाच्या दिवसावर विश्वास ठेवणे हे प्रत्येक व्यक्तीस गरजेचे आहे.

इस्लामची निर्णयाच्या दिवसाची संकल्पना अतिशय सरळ, सहज आणि स्वीकारण्यायोग्य आहे. या संकल्पनेनुसार प्रत्येक व्यक्ती आपल्या कर्मासाठी जबाबदार आहे. आपले जीवन अत्यंत जबाबदारीने जगावे कारण त्याच्या प्रत्येक कर्मासाठी तो अल्लाहसमोर उत्तरदायी आहे. मानव या जगात मोकाट सोडलेला प्राणी नाही. त्याला एके दिवशी मृत्यूशी सामना करणे आहे. मृत्युनंतर त्याला आपल्या निर्माणकर्त्या अल्लाहसमक्ष जाणे आहे. तो विचारणा करील भूतळावरील जीवनयापन कसे केले? जर त्याने पवित्र न्यायपूर्ण आणि ईश्वरापेक्षित जीवन जगलेले असेल तर तो ईश्वराच्या दरबारी यशस्वी होईल. तो सुख समाधानाने परिपूर्ण स्वर्गाचा हक्कदार होईल आणि स्थायी चिरंतर स्वर्गाचा निवासी होईल. या विपरित जर मनुष्य शक्ती व अत्याचारावर अवलंबून अल्लाहच्या जमिनीवर अल्लाहचा; त्याच्या प्रेषितांचा व अल्लाहच्या अधिकारात दुसऱ्याला भागीदार करुन जीवनयापन करुन आलेला असेल तर तो अल्लाहच्या दरबारी अयशस्वी ठरेल. मग तो अल्लाहच्या कोपाचा वाटेकरी आणि नरकाचा हक्कदार बनेल. तेथेच त्याला सदैव राहावे लागेल. ही धारणा किंवा विश्वास प्रत्येक व्यक्तीस त्याच्या कर्मासंबंधी त्यास उत्तरदायी व जबाबदार ठरविते. तद्नंतर असा विश्वास प्रत्येक व्यक्तीमध्ये, जबाबदारी व उत्तरदायित्वाची भावना निर्माण

करण्यास प्रोत्साहन देतो. जो समाज या विश्वासावर जितका दृढ असेल, त्या समाजामध्ये मानवाधिकाराबद्दल जास्तीतजास्त सन्मान; न्याय प्रवृत्ती, सत्य व संयमाबद्दल आस्था दिसेल. हा विश्वास समस्त मानवजातीला सद्मार्गाचा जामीन देणारा ठरेल. हा विश्वास जितका कमजोर असेल तितकाच आतंक व अत्याचाराचा प्रसार होईल. सध्या सर्वत्र आतंक, अत्याचार, जुल्म व जबरदस्ती व असमानतेची जी परिस्थिती दृष्टीस पडते त्याचे एकमेव कारण आहे निर्णयाच्या दिवसाच्या संकल्पनेचा अभाव. भारतीय समाजाच्या विकासासाठी 'निर्णयाच्या दिवसावर विश्वास' हा एकमात्र उपाय आहे.

या उपरोक्त सत्याचा स्वीकार केल्यानंतर ज्या गोष्टी स्पष्टपणे समोर येतात आणि ज्यांना आधुनिक विचारसरणीनुसार महान तात्त्विक सत्य म्हणून स्वीकार केल्यानंतर मानवी अधिकाराचा जी परमोच्य ध्येये बनतात ती अशाप्रकारे -

१) मानवी श्रेष्ठता, बंधुभाव, समानता व सहजीवन.

२) वैश्विक जागृतीची महत्ता जिचा मूळ पाया स्वतंत्र शास्त्रीय अनुसंधान व परीक्षणावर आधारित आहे.

३) धार्मिक व जातीय संघर्षाचे उच्चाटन.

४) स्त्री-स्वातंत्र्य व पुरूषासमान आध्यात्मिक अधिकार.

५) सर्व प्रकारच्या गुलामी व शोषणापासून मुक्ती.

६) श्रमाचे श्रेष्ठत्व व सन्मान.

७) धर्म, राष्ट्रीयता, रंग, वंश यांचा भेदभाव न करता मानवी एकात्मता व सहकार्याची प्राप्ती. वास्तविकत: इस्लाम आध्यात्मिक व चारित्र्याच्या मूळ पायावर विश्वबंधुत्वाच्या तत्त्वावर संपूर्ण मानवजातीच्या समानतेची सकारात्मक योजना आहे.

८) वर्णभेद, जातीभेद, आर्थिक शोषण, गर्व, धार्मिक द्वेष या सर्व बाबींचे उच्चाटन करुन न्यायप्रिय समाजाचे निर्माण करणे.

९) वानप्रस्थाश्रमाचा पूनर्विचार

१०) आर्थिक सुबत्ता, उत्पादन वृद्धी, संपत्तीच्या समान वितरणास महत्त्व व इस्लामच्या तत्त्वनिष्ठ निमंत्रणास समजून घेतल्यानंतर वळू या आपल्या मूळ मुद्द्याकडे - देशासाठी इस्लामचा संदेश काय आहे व आपल्या देशाला इस्लामची आवश्यकता का आहे?

## देशाच्या नावे इस्लामचा संदेश :-

भारतामध्ये चार हजार वर्षांची अनेकेश्वरवादी व मूर्तीपूजक संस्कृती आपसांतील दूही संघर्षाची प्रदीर्घ कहानी आहे. राजनैतिक संघर्ष, सामाजिक भेदभाव, तत्त्व व दृष्टिकोनांची संकीर्णता या गोष्टी भारताच्या जणू गुणविशेषच बनून राहिल्या आहेत. आज जो हा विशाल भारत आपण पाहात आहे, इंग्रजांच्या आगमनापूर्वी इतका विशाल देश कोण्या एका केंद्रीय राज्यसत्तेच्या अधीन कधीही नव्हता. चौथ्या व पाचव्या इसवी शतकात गुप्त वंशाद्वारे एका विशाल साम्राज्याची स्थापना झाली व सातव्या शताब्दीच्या पूर्वार्धात सम्राट हर्षवर्धनने दक्षिण भारतात एका विस्तृत साम्राज्याची स्थापना केली. वास्तविक मुस्लिमांचे या देशावर उपकार आहेत की त्यांनी आपल्या बुध्दीविवेकाने व प्रयत्नाने, शौर्य व चिकाटीने या देशातील विखुरलेल्या अवस्थेला बंगालपासून काबूलपर्यंत एका सशक्त साम्राज्याला अस्तित्व प्रदान केले. तद्नंतर एक भौगोलिक एकात्मतेमध्ये ओवण्याचा जबरदस्त प्रयत्न केला. काही अपरिहार्य राजनैतिक कारणास्तव देशी राजा-महाराजांचे अस्तित्व कायम ठेवले, पण तेही केंद्रीय सत्तेच्या अधीन व मांडलिक होते. इ. स. १९४७ मध्ये स्वातंत्र्यप्राप्तीनंतर त्यांचे अस्तित्व समाप्त करण्यात आले, पण कोणत्याही राष्ट्राच्या अस्तित्वासाठी, संपूर्ण देशाला एका केंद्रीय सत्तेअधीन राजकीय व भौगोलिक एकात्मतेत परिवर्तीत करणे पर्याप्त नाही. अशाप्रकारचे प्रयत्न भूतकाळातसुद्धा करण्यात आले होते. पण भारतीय समाजातील आपसांतील दूही व संघर्षामुळे ते एकत्र येऊन पुन्हा विखुरले गेले. आज आमच्या देशाला स्वातंत्र्य प्राप्त होऊन ६० वर्षे झाली. लोकांमध्ये राष्ट्रप्रेमाची भावना अस्तित्वात आहे. सामान्य भारतीय आपल्या देशाला एकसंघ व एकात्म पाहू इच्छित आहे. परंतु देशात अराजकता निर्माण करणाऱ्या फुटीरवादी शक्ती कार्यरत आहेत. या प्रतीक्षेत आहेत की लोकांच्या मनामध्ये राष्ट्रप्रेमाच्या भावनेमध्ये शिथिलता यावी व केंद्रीय शासनामध्ये असमर्थता यावी. या संधीचा लाभ घेऊन भारताची शकले उडविण्याची उदाहरणार्थ, आसाम चळवळ, खलिस्तान चळवळ, मिझो बंडखोरांचे उपद्रव, तेलंगाणा मूव्हमेंट, केरला व तामिलनाडू राज्यांची अधिक स्वाधीनतेची मागणी हे सर्व फुटीरवादी प्रवृत्तींचे द्योतकच म्हणावे लागेल. हिंदी भाषेचे समर्थक व विरोधक यांचे संघर्ष तर या सत्य परिस्थितीचे जीवंत चित्र आहे. आता तर भाषा व प्रदेशाच्या नावावर राजनैतिक प्रादेशिक पक्ष द्रुतगतीने अस्तित्वात येत आहेत. सध्या केंद्रीय सत्तेबाबत जनतेत निराशा स्पष्ट दिसत आहे. ते मोठ्या प्रमाणात क्षेत्रिय पक्षांना समर्थन देत आहेत. निरनिराळ्या राज्यात विशेषत: सीमावर्ती राज्यात अशा स्थानिक पक्षांना मोठ्या प्रमाणावर विजय प्राप्त होत

आहे व त्यांना सत्ता प्राप्त होत आहे. ही धोक्याची घंटा नाही काय? रशिया व अमेरिकेचे हस्तक व त्यांच्या गुप्त संघटना भारताच्या स्वातंत्र्याला, एकात्मतेला, स्वायत्ततेला सुरूंग लावू इच्छित आहेत. भारतीय कम्युनिस्ट पार्टी व राष्ट्रीय स्वयंसेवक संघ यांचे प्रयत्न या दिशेमध्ये नोंद घेण्यासारखे आहेत.

आधुनिक भारताच्या शिल्पकारांना या गोष्टीची जाणीव मर्यादित होती की भारतीय संस्कृती आपल्या मर्यादित दृष्टीच्या जीवन तत्त्वज्ञान, सामाजिक विषमता व सामाजिक जाणिवांच्या अस्तित्वानंतरही आधुनिक भारताच्या उभारणीमध्ये सार्थक सहभाग देण्यास असमर्थ आहे. म्हणून त्या लोकांनी हिंदू तत्त्वज्ञानास डावलून विदेशी तत्त्वज्ञानाला निमंत्रित केले जेणेकरुन भारताच्या नवनिर्मितीस पोषकता मिळेल. ते तत्त्वज्ञान आहे समाजवाद, निधर्मियता, प्रजातंत्र आणि राष्ट्रीयत्व. हे आधुनिक तत्त्वज्ञान फ्रांस, रशिया, जर्मनी व इग्लंड या राष्ट्रांकडून आयात केले गेले. परंतु हे तत्त्वज्ञानसुद्धा भारतातून सामाजिक व सांस्कृतिक विलगता दूर सारण्यास अयशस्वी ठरले. हिंदू-मुस्लिम संघर्ष, तामीळ व हिंदीची रस्सीखेच उत्तर आणि दक्षिणवाद मागासवर्गीय व सवर्ण तणाव जाती-धर्माचे श्रेष्ठत्व, कनिष्ठत्व, दलित व सवर्ण, हरिजनांना जिवंत जाळणे किंवा त्यांच्या वस्त्या उद्ध्वस्त करणे. त्यांच्या स्त्रियांना बेअब्रू करणे हे सर्व प्रमाण आहे की देश सांस्कृतिक एकात्मेपासून अद्याप खूप खूप लांब आहे. या देशात प्रबळ असा धार्मिक प्रवाह नाही. जे काही आहेत ते लहान सहान ओढे (उींश्रींशींी) आहेत व ते सर्व विरोधार्थी एवं संघर्षात्मक आहे आणि एक दुसऱ्याच्या विरुद्ध दिशेत वाहणारे आहेत. अद्याप या देशातील एका विशाल गटाला (ारक्षीळीूं) (बहुसंख्याकांना) अद्याप समानतेची व स्वातंत्र्याचे संधी प्राप्त झालेली नाही. स्वातंत्र्याच्या व समानतेचे अधिकार प्राप्त करण्याच्या त्यांच्या प्रयत्नाची शिक्षा म्हणून त्यांना आपल्या जीवनांची व मालमत्तेची आहुती द्यावी लागत आहे. या देशात मुस्लिम व हरिजनांबरोबर जे काही व्यवहार होत आहेत ती उपरोक्त विधानाला सिद्ध करणारी करुण कहाणी आहे आणि या कटामध्ये राजकारणी, शासकीय यंत्रणा, पोलीस, प्रसारमाध्यम आणि दुर्दैवाने न्यायसंस्थासुद्धा बरोबरीने सहभागी आहेत.

## राष्ट्रीय संस्कृतीचा शोध :-

सद्य परिस्थिती प्रत्येक माणुसकीप्रिय व राष्ट्रप्रेमी नागरिकासाठी गहन चिंतेची बाब बनलेली आहे. वास्तविकत: भारत एका अशा राष्ट्रीय संस्कृतीच्या शोधात आहे जी आपसांत ऐक्य व सुरक्षिततेची पूर्ण हमी देणारी असेल. यासाठी देशाला अशा एका ठोस श्रद्धेची कास धरावी लागेल, ज्यात विस्तृत्वता आणि समानता असेल. शिवाय सर्वांना बरोबर घेऊन चालण्याची अनुपम सामर्थ्य शक्ती असेल. भारतात विभिन्न

धर्माचे पालन करणारे लोक आहेत. अनेक भाषा बोलणारे आहेत. प्रत्येक विभागाच्या रूढी व सवयी विभिन्न आहेत. आर्थिक तफावत तर अगदी चरण सीमेवर पोहोचलेली आहे. संपूर्ण देश जाती, उपजाती व गटांत विभागला गेलेला आहे. जात-बिरादरीचा जोर आहे. अशा बिकट स्थितीत इस्लाम या कसोटीवर कसा उतरू शकेल? सध्याच्या काळाचा हा सर्वात महत्त्वपूर्ण प्रश्न आहे. आपण याच पार्श्वभूमीवर इस्लामचा भारताचा सामाईक राष्ट्रीय सांस्कृतिक पुरस्कर्ता म्हणून उल्लेख करू.

१) इस्लाम एकेश्वर श्रद्धेचा समर्थक आहे आणि जगातील सर्व धर्मांना मान्य आहे की सर्वशक्तिमान ईश्वर एकच आहे. त्याच्या शक्तींमध्ये दुसऱ्याची भागीदारी अज्ञानावर आधारित आहे आणि त्याचा कसल्याच प्रकारचे शास्त्रीय व तात्त्विक अधिष्ठान नाही.

२) सृष्टीचा निर्माणकर्ता एकच 'अल्लाह' आहे. म्हणून इस्लाम संपूर्ण सृष्टीला एक मानणारा आहे. आपली धरती या संपूर्ण सृष्टीचा एक घटक आहे. या श्रद्धेनुसार क्षेत्रिय वेगळेपण किंवा विभक्तपणाच्या सर्व कल्पना संपतात.

३) मनुष्य अल्लाहचा दास व एकाच माता-पित्याची संतान आहे, म्हणूनच सर्व मानव आपसांत बंधु व समान आहेत. या विश्वासानुसार सर्व वांशिक, जातीय, राष्ट्रीय, विभागीय, धार्मिक, पोटजातीय वेगळेपणाची कल्पनाच शिल्लक राहत नाही. अशा प्रकारे मानवामानवांत उभ्या ठाकलेल्या भिंती निश्चितच कोसळून जातात.

४) भाषा हे विचार व्यक्त करण्याचे साधन आहे. ती दोन व्यक्तींदरम्यान संपर्क व संबंध निर्माण करते. सर्व भाषा ईशनिर्मित आहेत. म्हणूनच सर्वच भाषा उत्तम आहेत. ज्यांप्रमाणे माणसामाणसात अंतर केले जाऊ शकत नाही. तद्वत कोणत्याही भाषेबद्दल द्वेष अनुचित आहे. सर्व भाषांना प्रसार, विकास व समृध्दीची समान संधी प्राप्त झाली पाहिजे.

५) सर्व मानवांना सामाजिक, राजनैतिक, आर्थिक, सांस्कृतिक व कायद्याचे समान हक्क आहेत. म्हणून सर्वांना समान संधी प्राप्त झाली पाहिजे. दुदैवाने एखादी व्यक्ती काही कारणास्तव या जीवनस्पर्धेत मागे पडत असेल तर त्याला सामाजिक मदतकार्य करणाऱ्या संस्थांनी साहाय्य करावे, जेणेकरून त्या व्यक्तीस सन्मानपूर्वक जीवनयापन करता येईल व सर्व प्रकारच्या अत्याचार, अपमान व मानवी गुलामीपासून त्याचे रक्षण होईल.

६) प्रत्येक व्यक्तीस त्याच्या पसंतीनुसार व श्रद्धेनुसार जीवन जगण्याचे स्वातंत्र्य मिळाले पाहिजे. त्याचप्रमाणे धर्मप्रसार व प्रचाराच्या प्रयत्नांत कसलीही आडकाठी येऊ नये. याबाबतीत कोणत्याही प्रकारची भीती, अपमान अथवा दोष देण्याची मुभा दिली जाऊ नये. कोणीही दुसऱ्यांस त्याचा धर्म विकत घेऊन, अयोग्य भीती दाखवून

अथवा प्रलोभन देऊन धर्मांतर करण्याचा प्रयत्न करु नये. एखादी व्यक्ती पूर्ण संमती, स्वखुशी व स्वेच्छेने दुसरा धर्म स्वीकार करीत असेल किंवा स्वत:चा धर्म रद्द करीत असेल तर त्याच्या आर्थिक, सांस्कृतिक, राजकीय व न्यायिक अधिकारांवर व हक्कांवर कसल्याच प्रकारचा परिणाम व गदा येता कामा नये.

या वास्तविकतेवरुन आपण समजू शकतो की इस्लाम भारतामध्ये सर्वसंमत राष्ट्रीय संस्कृतीच्या संवर्धनामध्ये किती महत्त्वाचे व सकारात्मक कार्य करु शकतो. संपूर्ण भारत इस्लामचा पुरस्कर्ता झाला तर आपसांतील मतभेद, उच्च-नीचता ज्यामुळे राष्ट्रीय संस्कृतीला तडा जात आहे, लगेच पूर्णत: समाप्त होऊन जातील. मी या देशाच्या सर्व नेतेमंडळींना व विशेषत: भारताच्या तमाम जनतेस आव्हान करू इच्छितो की त्यांना या देशाशी, येथील मातीशी, येथील जनतेशी खरे प्रेम असेल तर त्यांनी इस्लामचा स्वीकार केला पाहिजे. केवळ इस्लाममुळेच भारतात राष्ट्रीय एकात्मता, संपूर्णता, बंधुभाव व समानता प्रस्थापित होणार आहे. भारताला आपल्या अस्तित्वासाठी आणि उन्नतीसाठी इस्लामची आवश्यकता आहे. मी देशवासीयांना नम्र विनंती करितो की  समाजवाद व धर्मनिरपेक्षता अशी विदेशातून आयात केलेली तत्त्वे, ऐतिहासिक व व्यवहारिक स्तरावर अयशस्वी व विफल झालेली आहेत, तरीही त्यांचा प्रयोग भारतात केला जात आहे. त्याची कडू फळ भारताने भोगलेली आहेत. तर मग एकदा भारताने इस्लामचा प्रयोग करुन पाहण्यास काय हरकत आहे? जर इस्लामप्रयोगसुध्दा अयशस्वी ठरला तर तो रद्द करण्यास काहीच हरकत नाही.

मला ज्ञान नाही की महात्मा गांधीजी कोणत्या भावनेच्या आधारे खालील विधान केले होते. एकदा त्यांना विचारण्यात आले होते की स्वतंत्र भारतामधील स्वराज्याबद्दल त्यांची कल्पना काय आहे? तेव्हा त्यांचे उत्तर होते की ''मी भारतामध्ये माननीय उमरच्या शासनप्रणालीप्रमाणे शासनपद्धतीची अपेक्षा करीत आहे.'' इस्लामच्या उत्तम गुणांवर विवेचन करताना भारताचे माजी राष्ट्रपती राधाकृष्णन यांनी आपले एक पुस्तक 'द हार्ट ऑफ इंडिया'मध्ये खालील शब्दांत स्वीकृती दिली आहे.

''इस्लाम एक असा धर्म आहे जो गुंतागुंतींपासून पूर्णत: अलिप्त आहे. हे एक असे सांस्कृतिक प्रयोजन आहे, ज्यामध्ये जात-पात वंशपारंपारिक पुजाऱ्यांसाठी कोठेच थारा नाही. इस्लामने एकेश्वरत्व व जागतिक बंधुभावच्या माध्यमाद्वारे जगातील अनेक अंधाऱ्या कानाकोपऱ्यातून अतिभयंकर रुढीं व सवयींचा नायनाट केला आहे. करोडो मानवांच्या जीवन स्तराला उंचावले आहे. त्यांनी अज्ञानी व मागासलेल्या जातींना स्वार्थासाठी प्रचलित केलेल्या अनेकेश्वरवाद, बालहत्या, मनुष्यबळी, भूतप्रेताची उपासना, जादूटोना इत्यादींसारख्या कुप्रथेतून मुक्तीसाठी मोठी मदत

केली."

इस्लाम आजसुद्धा भारतात हे कर्तव्य पार पाडण्यास समर्थ आहे आणि येथील भयावट रुढींपासून भारतीय समाजाला मुक्त करण्याचे सामर्थ्य बाळगत आहे.

## इस्लाम शांती आणि स्वातंत्र्यासाठी :-

भारतासाठी इस्लामच्या संदेशावर विचार केल्यानंतर त्याचा दुसरा पैलू आपल्यासमोर येतो तो आहे शांती व स्वातंत्र्य! इस्लाम शांतीचा पुरस्कर्ता आहे. हा शांतीचा रक्षक, स्वातंत्र्याचे नेतृत्व करणारा आहे. इस्लाम स्थायी शांतीचा अभिलाषी आहे. हा फुटीरवादी प्रवृत्तींना एकामागे एक समाप्त करतो. सकल मानवजातीला समानतेच्या दर्जावर आणून त्याने सर्व प्रकारचे राजनैतिक, सामाजिक, आर्थिक भेदभाव समाप्त केले आहेत. त्याचबरोबर कटाक्षाने हीसुद्धा व्यवस्था केली आहे की कोणत्याही बाजूने व चोरपावलांनी यांत दुराचार येऊन पुन्हा आतंक व संघर्षाचे आगमन होण्याची संधी मिळू नये. आपल्या न्याय्य व उचित हक्कप्राप्तीनंतरसुद्धा जर कोणी व्यक्ती अतिक्रमणाद्वारे दुसऱ्याच्या हक्कावर गदा आणू इच्छित असेल तर इस्लाम नैतिक व विधायक मार्गाने त्यास आळा घालतो. इस्लामच्या दृष्टीने आंतकवाद हा हत्येपेक्षाही अधिक घृणित आहे. म्हणून आतंक फैलावणाऱ्याला मृत्यूदंडाची तजवीज आहे, जेणेकरुन समाजातीत स्थैर्य व शांती भंग होऊ नये. इस्लामी शिक्षेत सक्ती याच दृष्टिकोनामुळे ठेवलेली आहे. आज भारतात अशांती व व्यभिचाराचे साम्राज्य आहे. गुन्हेगारी दिवसेंदिवस वाढत आहे. सामान्य माणसाची शांती व शाश्वती नाहिशी होत आहे. जनता प्रत्येक क्षणी आतंकित चिंताग्रस्त आहे. बलवान अशक्तांना दाबू इच्छित आहे. गरीब व कमजोर लोकांचे ऐकणारा कोणी नाही. अधिकारांच्या विभागणीमध्ये असमानता आहे. या परिस्थितीने संपूर्ण समाजाला ज्वालामुखीच्या तोंडावर आणून उभे केले आहे. देशात एक असा समाज आहे की त्याच्याजवळ अभावच अभाव आहे. म्हणजेच तो नाहीरे वाला आहे त्यास दुपारचे अन्न मिळाले तर रात्रीच्या जेवणाची विवंचना असते. कधीकधी तर त्याला दोन्ही वेळच्या जेवणास मुकावे लागते. भारतात ६ व्या पंचवार्षिक योजनेच्या जनगणनेनुसार राष्ट्राच्या पूर्ण जनसंख्येच्या शेकडा ४० लोक दारिद्र्यरेषेखाली आहेत. अर्थात सन १९७०-७१ च्या जीवन निर्देशकानुसार त्यांची प्रत्येक दिवसाची कमाई ०.३५ रुपयांपेक्षा अधिक नाही. एकीकडे किंमतीमध्ये अकल्पनीय वृध्दी व आमदनीमध्ये सीमित व अल्प वाढीमुळे वास्तविक जीवन किती कष्टप्राय झाले असेल याची कल्पनासुद्धा करवत नाही. दुसऱ्या बाजूस देशात बोटावर मोजण्याइतका एक समाज आहे, जो संपूर्ण देशाच्या संपत्तीपैकी ८० टक्के संपत्तीचा स्वामी आहे. शासन, न्यायसंस्था, पोलीस, प्रसारमाध्यम सर्व याच मूठभर समाजाच्या

वचनामध्ये व त्यांच्या बाजूने आहे. त्या सर्वांच्या संगनमताने सामान्य नागरिकाला जनावराच्या रांगेत आणून उभे केले आहे. हळूहळू समाजाचा पोलीस, कायदा व न्यायसंस्थेवरुन विश्वास ढळू लागला आहे. या संस्था आता अपराध व अत्याचाराला नियंत्रित करण्याऐवजी त्याला प्रोत्साहन देत आहे. आज भारतात सामान्य नागरिकाची परिस्थिती पाहण्याजोगी आहे. तो आर्थिक, राजनैतिक, धार्मिक, सांस्कृतिक, जैविक व वित्त या सर्वांत स्वत:ला असुरक्षित समजत आहे (अशा) लोकांमध्ये निराशा व गैरसमज दिवसेंदिवस वाढत आहे. कारण आजचे राजकीय नेता गुन्हेगार, यायनिवाडा बेईमानी, प्रशासन गैरव्यवस्था, पोलीस-चोर, वृत्तपत्रे पक्षपाती, व्यभिचारी व सुखलोलूप स्वार्थी झालेली आहेत. या स्थितीत अन्याय व अनागोंदी वाढली नाही तरच नवल!

गरज आहे की देशाचे शासक अल्लाहची भीती बाळगणारे, न्यायाच्या दिवसाची चिंता करणारे, मनुष्यमात्राचे खरे मित्र, न्यायप्रिय, उच्चतम चारित्र्याचे धनी व ईमानदार असावेत. ज्यांच्या पाठीशी श्रेष्ठ श्रद्धेची शक्ती व जागृत नागरिक शक्ती असावी. हे कार्य निव्वळ इस्लामी परिवेषातच संभव आहे. जोपर्यंत भारत इस्लामी संस्कृतीमध्ये परिवर्तीत होत नाही तोपर्यंत देशामध्ये स्थायी शांती व कायद्याचे राज्य अशक्यच आहे. गरीब व निर्बल लोकांच्या हितांच्या रक्षणासाठी मी आव्हान करू इच्छितो; की देशातील सर्व पद्दलित लोकांनी शांती व न्यायाची ही ध्वजपताका आता आपल्या हाती घेतली पाहिजे. दुसऱ्या जागतिक महायुद्धाच्या काळात बर्नार्ड शॉ ने म्हटले होते की आज जगावर पैगंबर मुहम्मद (स.) यांची राजवट प्रस्थापित झाली तर या संसारात सुरक्षितता व शांती कायम होईल. गरज पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या राजवटीची नव्हे तर त्यांच्या तत्त्वांना आचरणामध्ये आणण्याची आहे. जर आज पूर्ण श्रद्धा व विश्वासाने पैगंबर (स.) यांनी दर्शविलेल्या तत्त्वांच्या प्रकाशात भारताच्या समाजाची नवनिर्मिती केली गेली तर शांती व सुव्यवस्थची प्राप्ती फारच सोपी व सुलभ आहे.

स्वातंत्र्य म्हणजे निव्वळ परकीय सत्तेपासून मुक्ती नव्हे. स्वातंत्र नाव आहे मानवाने सन्मानपूर्वक जीवन जगण्याचे. भारतासारख्या देशात जेथे बहुमत व अल्पमत या तत्त्वावर निर्णय घेतले जातात, तेथे वास्तविक स्वातंत्र व लोकतंत्राची कल्पना करणे शक्य नाही. बहुमत हे कसल्याही स्थायी मापडदंडाचे प्रमाण नसते. कारण या तत्त्वानुसार आजची योग्य बाब उद्या अयोग्यसुद्धा ठरविली जाते. उदाहरणार्थ, जनता पार्टीच्या शासनकाळात मद्यपान अयोग्य होते तर इंदीराजींच्या शासनकाळात मद्यपान स्वीकृत होते. जोपर्यंत आमची लोकशाही स्थायी अधिकारांची उपासक होत नाही

तोपर्यंत तरी अल्पसंख्याक समाज खऱ्या लोकशाहीचे स्वप्न पाहू शकत नाही. इस्लाम मानवाला प्रत्येक मानवाच्या गुलामीपासून मुक्ती देतो. इस्लामी श्रद्धेनुसार महान फक्त अल्लाह आहे. इतर सर्व समान आहेत. कोणालाही कोणावर मालकी अधिकार प्राप्त नाही. एक व्यक्ती देशाचा शासनाधिकारी होऊ शकतो. परंतु त्याच्या कामाचे योग्य परीक्षण करण्यासाठी जर ठोस नियमांचा अभाव असेल, तर तो हुकूमशहा बनतो. आज भारतातील सर्व (अल्पसंख्याक) भयभीत व भेदरलेले आहेत त्याचे कारण आहे शासनकर्त्यांचे सदैव बदलणारे दृष्टिकोन. काही वेळेस राष्ट्रीय नेते तत्त्वांपेक्षा मूलभूत अधिकारांना अधिक महत्त्व देतात, तर कधीकधी मूलभूत अधिकारापेक्षा तत्त्वांना. जेव्हा जेव्हा व जसजसे त्यांना हवे आहे राष्ट्राच्या घटनेमध्ये संशोधन व बदल करतात. गत २४ वर्षांमध्ये घटनेत ४७ वेळा संशोधन वा बदल करण्यात आले आता तर घटनेच्या घोषवाक्यांमध्ये (आत्मा) परिवर्तन घडवून आणले जात आहे. ही सर्व वाटचाल मानवी सन्मान व स्वाधीनतेच्या कल्पनेच्या विपरीत आहे. लोकशाही तत्त्वांना स्थायी अशा मूलभूत पायावरच कार्यरत असावयास हवे. इस्लाममध्ये लोकशाहीचा अर्थ आहे अल्लाहची सत्ता. जनतेचे प्रतिनिधित्व म्हणजेच सर्वाधिकार पूर्णतः अल्लाहच्या केंद्री. त्यात कोणाचीही भागीदारी नाही. जनतेस केवळ आपल्यापैकी उत्तमात उत्तम व्यक्ती अथवा संस्थेची निवड करुन त्याच्या हाती प्रशासनाची जबाबदारी सोपविणे व तद्नंतर पर्यवेक्षक (डणझएठतखडजठ) व प्रतिनिधी बनून अल्लाहने कायम केलेल्या तत्त्वानुसार कार्य होत आहे किंवा नाही हे पाहाणे. जेथे कोठे त्या तत्त्वांना डावलून शासन चालत आहे असे दिसेल तर जनतेस हक्क व अधिकार आहे की त्यांस पुन्हा ईशनिर्देशनानुसार कार्य करण्यास बाध्य करावे. इस्लामी लोकशाहीनुसार कोणा एका व्यक्ती अथवा पक्षास कायमस्वरुपी मक्तेदारी प्राप्त होत नाही. येथे मनमानी व हुकूमशाहीस अजिबात वाव नाही. प्रतिनिधींची निवड जनतेद्वारा होईल. जनता केवळ प्रतिनिधींचीच नव्हे तर त्यांच्या कार्यकारी मंडळाचीसुद्धा निवड करेल. प्रतिनिधींवर बंधनकारक राहील की आपल्या कार्यकारी मंडळच्या सल्ल्याने अल्लाहच्या नियमानुसार प्रशासन करावे. अशाप्रकारे प्रतिनिधी व त्यांचे कार्यकारी मंडळ अल्लाहच्या ठायी उत्तरदायी राहतील. जर परिस्थिती व कार्यप्रणाली अल्लाहच्या आदेशाविरुद्ध जात असेल तर प्रतिनिधी व त्यांचे कार्यकारी मंडळ यांना जनतेकडून आज्ञापालन करण्याचे हक्क राहणार नाही. याउलट जर बलपूर्वक आज्ञापालन मागण्याचा मागणी होत असेल तर जनतेस आज्ञापालन न करण्याचा हक्क आहे. उलटपक्षी त्यांनी आज्ञापालन कदापि करु नये.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी स्पष्ट जाहीरपणे फर्माविले आहे, ''अल्लाहच्या अनुज्ञेमध्ये कोणाच्याही आदेशाचे पालन करू नका'' *(हदीस)*

एका दुसऱ्या ठिकाणी पैगंबर (स.) म्हणतात, "अत्याचारी शासकासन्मुख सत्यवचन करणे हा सर्वात मोठा जिहाद (आहुती) आहे."

अशाप्रकारे लोकप्रतिनिधी व त्यांचे कार्यकारी मंडळ यांना सत्कर्मासाठी बाध्य करुन व त्यांच्या आवाहनानुसार आम जनतेस त्यांचे आज्ञापालन करण्याचे आदेश देऊन वास्तविक इस्लामने मानवी सन्मान व स्वातंत्र्याचे रक्षण केले आहे. परस्परांचे हक्क व अधिकारपूर्ती करण्याची व त्याचा सन्मान करण्याची आज्ञा दिली आहे. वास्तविक लोकशाही आपसांतील एकी व विश्वास या ठोस तत्त्वामुळेच प्राप्त होऊ शकते.

## आमच्या समस्याची कारणे :-

आमचा देश सध्या संकटांतून जात आहे व अनेक प्रकारच्या गुंतागुंती व समस्यांना तोंड देत आहे. प्रत्येक क्षणी व प्रत्येक ठिकाणी जीवन व संपत्तीची अनिश्चितता, लाचलुचपत, नैतिक अध:पतन लैंगिक स्वैराचार आ वासून आहेत. त्यामुळे सामान्य माणसाची पूर्ण पिळवणूक होत आहे. त्यात आणखी आहेत दंगे-धोपे, लुटालूट, जुलूम व अत्याचार. प्रत्येक व्यक्ती भयग्रस्त व गोंधळलेली आहे. विकासाच्या सर्व योजना व प्रतिबंधाचे सर्व उपाय अयशस्वी ठरले आहेत. याचे कारण काय आहे? माझ्या दृष्टीने याची चार कारणे आहेत.

१) विकासाची मंद गती,

२) अज्ञान व अंधश्रद्धा,

३) बेईमानी व नैतिक मूल्यांचे अध:पतन आणि

४) संपत्तीचे व संपत्ती उत्पादनाच्या साधनांचे अन्यायपूर्वक वितरण.

माझ्या दृष्टीने उपरोक्त चार कारणांपैकी शेवटची दोन कारणे जास्त महत्त्वाची आहेत. बेईमानी, भ्रष्टचार आणि संपत्तीचे अन्यायपूर्ण वाटप. या सर्व गोष्टींनी राष्ट्राच्या विकासाची क्षमता व उत्साह हिरावून घेतला आहे, ज्यामुळे विकासाची गती खूपच मंदावली आहे. परिणामत: लोक मन लावून व आत्मियतेने परिश्रम करत नाही. त्याचबरोबर कुशलता व बुध्दीचा पाहिजे तसा उपयोग केला जात नाही. ज्या वेळेस एखादा समाज प्रामाणिकतेचे रत्न हरवून बसतो तेव्हा त्या समाजामध्ये अनेक दोष निर्माण होतात. दुर्दैवाने भारतीय समाज प्रामाणिकतेचे रत्न हरवून बसलेला आहे. वास्तविक प्रामाणिक व मेहनती व्यक्ती समाजाचा मुकुटमणी असतो. म्हणूनच भारताला हे दिवस पाहावे लागत आहेत. इस्लाम माणसास ईमानदार व जबाबदार बनवितो. प्रत्येक वस्तूला योग्य, विवेकपूर्ण आणि न्यायपूर्ण पद्धतीने वापरण्यास, खर्च करण्यास व विनिवेश करण्यास लावतो.

इस्लाम पुरस्कर्ता आहे, उत्पादनवृध्दी व त्याच्या न्यायपूर्ण वितरणाचा! तो मानवाला चारित्र्याच्या उच्च शिखरावर पाहू इच्छितो. शिवाय ज्ञान व कौशल्यास मानवतेची समायिक संपत्ती ठरवून त्यापासून भरपूर लाभ घेण्याची सूचना देतो. अशाप्रकारे आज देशासमोर ज्या राजकीय, सामाजिक, आर्थिक, नैतिक व तांत्रिक समस्या आहेत, इस्लाम त्या सर्वांचे स्पष्ट व समाधानकारक उपाय प्रस्तुत करीत आहे. इस्लाम शांतीपूर्वक सहअस्तित्वाचा निमंत्रक, एकता व पूर्णत्वाचा ध्वजवाहक, बंधुभाव व समानतेचा रक्षक, आर्थिक न्यायाचा प्रणेता, सन्मान व स्वातंत्र्याचा रक्षक, शांती व समृद्धीचा संदेशवाहक आहे. कोणीही हे आजमावून पाहावे!

## एक महत्त्वपूर्ण प्रश्न :–

उपरोक्त सत्यांचा परिचय प्राप्त केल्यानंतर एखादा देशबांधव विचारेल की ज्याअर्थी इस्लाम एक उत्तम जीवनमार्ग आहे, तर मग आज मुस्लिम समाज व मुस्लिम राष्ट्रे विखुरलेली, दयनीय, मागासलेली, कमजोर व दुसऱ्यांच्या अधीन का आहेत? आज त्यांच्यासारखा अपमानित समाज जगाच्या पाठीवर कोठेच सापडणार नाही. जेथे हा समाज अल्पसंख्य आहे तेथेही व जेथे बहुसंख्य आहे तेथेसुद्धा! प्रत्येक ठिकाणी ते प्रताडित व अपमानित केले जात आहेत. अपमान व प्रताडना त्यांचे भाग्य बनले आहे. आर्थिक संपन्नता व अधिकारप्राप्तीसुद्धा त्यांना या अपमानित जीवनातून मुक्त करण्यास अयशस्वी ठरली आहे. हा प्रश्न उचित व महत्त्वपूर्ण आहे. या प्रश्नाचे अतिस्पष्ट, सरळ व सोपे एकच उत्तर आहे– 'आज मुस्लिम समाज व मुस्लिम राष्ट्रे इस्लामी आचरण व दृष्टिकोनापासून खूप खूप लांब आहेत. म्हणून ते त्याचीच शिक्षा भोगत आहेत.'

इस्लाम केवळ मानण्याची वस्तू नाही, तो नुसता वांशिकतेने प्राप्त झालेला धर्म नाही, तर एक व्यावहारिक आचरणाचा धर्म आहे. भूतकाळात मुस्लिमांनी इस्लामचे आत्मीयतेने व समानतेने पालन केल्याच्या परिणामतः संपूर्ण जगात सन्मान व विजय प्राप्त झाला होता. आजसुद्धा जर मुस्लिम समाज व मुस्लिम राष्ट्रे मनःपूर्वक जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात इस्लाम आचरणात आणतील तर पाहाता पाहाता कायापालट होऊन जाईल. इस्लाम एक असे अनुपम बीज आहे की जो कोणी त्याची पेरणी करील त्याला त्याचे मधुर फळ प्राप्त होईल. जे पेरणी करणार नाहीत, त्यापासून ते वंचित राहतील. ही वंचितता कोणत्याही ईमानधारकासाठी दोन पध्दतीने अल्लाहच्या दृष्टीत अपराधी ठरेल. पहिला अपराध आहे सत्यधर्म न मानण्याचा व दुसरा अपराध अल्लाहने दिलेल्या या सर्व कृपांबद्दल कृतघ्न बनण्याचा. माझी अल्लाहजवळ प्रार्थना आहे की सर्व विश्वासधारकांची या कृतघ्नतेपासून रक्षा व्हावी व प्रत्येक विश्वासधारकाच्या हृदयात इस्लामी शिकवण पालन व आचरण करण्याची प्रेमभावना निर्माण व्हावी. *(तथास्तु)*

## एक आवाहन (याचना) :-

अंतत: देशबांधवांना आवाहन करु इच्छितो की त्यांनी विनाकारण धर्मद्वेष व संकुचित दृष्टीमध्ये गुरफटून न राहता इस्लामचे विशाल सद्भावनेने व शास्त्रीय दृष्टिकोनाने अध्ययन करावे. जर त्यांना उमजले की वास्तविक इस्लाम उत्कृष्ट जीवनमार्ग आहे तर त्याचा अनुभव घेण्याचा प्रयत्न करावा. याविषयी अशी धारणा ठेवणे की इस्लाम फक्त मुस्लिमांचाच धर्म आहे चुकीचे आहे. आपल्या जातीधर्माच्या अभिमानाने प्रेरित होऊन सत्याचा इन्कार करणे योग्य नाही.

'अलबेरूनी' जो महमूद गजनीच्या स्वाऱ्यांच्या काळात भारतामध्ये आला होता, त्याने त्याचे पुस्तक 'किताबुल हजा'मध्ये हिंदू मानसिकतेचा उल्लेख केला आहे. त्या संबधात एम. पानिकर जे भारताचे सुप्रसिद्ध इतिहासतज्ञ व शिक्षणतज्ञ आहेत, अभिप्राय देतात की "तो एक अनुभूत दृष्टिकोन पेश करीत आहे." हिंदूंच्या संबधात अलबेरूनी म्हणतो, "हिंदूंची श्रद्धा आहे की त्यांच्यापेक्षा उत्तम राष्ट्र दुसरे कोणतेच नाही. त्याच्यापेक्षा उत्तम दुसरी कोणतीच जात नाही. त्यांच्या राजासमान कोणी दुसरा राजा नाही. त्यांच्या ज्ञानासमान दुसरे ज्ञान नाही."

प्रा. पानिकरांच्या मतानुसार ही अनुचित उच्चतेची भ्रामक कल्पना आहे. आज जग आकुंचन पावून फार लहान झाले आहे. पूर्वकाळी ज्ञान व अनुभवाच्या शृंखलेचे योग्य साधन नव्हते. याकाळी एखादा समाज अगर गट अशाप्रकारच्या भ्रमात असेल तर तो समाज क्षमेस पात्र असेल. पण आज अशाप्रकारचा धर्मद्वेष व संकुचित दृष्टीच्या अज्ञानाला मागासलेपणच समजावे लागेल. विशेषत: अशा वातावरणात जेथे आम्ही आज नवनवीन दृष्टिकोन व विचार स्वीकार करीत आहोत व प्रतिदिन नवनवीन प्रयोग करीत आहोत. ऋग्वेदाच्या शिकवणुकीनुसार- "उत्तम विचारांना चारी बाजुंनी येऊ द्यावे." -आपल्या मनाचे द्वार सदैव उघडे ठेवले पाहिजे. आपल्या जीवनाद्वारे सत्यप्रेम व सत्यउपासनेची साक्ष दिली पाहिजे.

## अंतिम भाष्य :-

याप्रसंगी मी इस्लामी विद्यार्थी संघटनेच्या कार्यकर्त्यांना व सामान्य मुस्लिमांना अपील करु इच्छितो की इस्लामी जगताचा केवळ तात्त्विक दृष्टीने स्वीकार न करता इस्लामचे व्यावहारिक प्रतिनिधित्व करुन आपल्या समाजाचे इस्लामीकरण करण्याचा प्रयत्न करावा. शिवाय इस्लामचा संदेश भारताच्या घराघरांपर्यंत पोहचविण्यासाठी सुनियोजित योजना बनवावी. पूर्ण समाजाला संघटित व सुनियोजित करुन या इस्लामी निमंत्रणास सर्वदूर पसरविण्याचे प्रयत्न करावे. (तथास्तु)

-: समाप्त :-